चक्रमुद्रण भत्त्याच्या दरात सुधारणा.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: रोनिभ १०९१/प्र.क्र.२९३/९१/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ८ एप्रिल, १९९१.

पहा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: एसपीपी १०६३/११०९/पाच,
दिनांक २१ ऑगस्ट, १९६४.

शासन निर्णय :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.एसपीपी १०६३/११०९/पाच, दिनांक २१ ऑगस्ट, १९६४ अन्वये चक्रमुद्रण चालकांसाठी चक्रमुद्रण भत्त्याचे मासिक दर विहित केलेले आहेत, त्याचप्रमाणे चक्रमुद्रण चालक नियमित रजेच्या कालावधीत अथवा नैमित्तिक रजेवर अनुपस्थित असल्यास त्याच्या अनुपस्थितीत यंत्रचालकाचे काम करणाऱ्या शिपायाला द्यावयाच्या भत्त्याचे दैनिक दरही विहित केलेले आहेत. चक्रमुद्रण चालकाच्या पदाला दिनांक १ एप्रिल १९७६ पासून नियमित वेतनश्रेणी देण्यात आल्यामुळे उक्त शासन निर्णयातील मासिक दराची आवश्यकता उरलेली नाही. तसेच चक्रमुद्रण यंत्रचालकाच्या अनुपस्थितीत चक्रमुद्रण चालकाचे काम करणाऱ्या शिपायाला द्यावयाचे भत्त्याचे दैनिक दर हे फार पूर्वीचे म्हणजे जवळजवळ २५ वर्षांपूर्वीचे आहेत. चौथ्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार शासनाने वेतन व भत्त्याच्या विविध दरांमध्ये सुधारणा केलेली आहे या दृष्टीने वरील चक्रमुद्रण भत्त्याचे दर सुधारणे अत्यावश्यक झालेले आहे.

२. त्याचप्रमाणे अलिकडे जवळजवळ सर्व शासकीय कार्यालयांमध्ये झेरॉक्स यंत्राचा वापर करण्यात येत आहे. झेरॉक्स यंत्रचालकाच्या पदालासुध्दा नियमित वेतनश्रेणी देण्यात आली आहे. तथापि नियमित झेरॉक्स यंत्रचालकाच्या नियमित रजेच्या कालावधीत अथवा नैमित्तिक रजेच्या कालावधीत ज्या शिपायाकडून झेरॉक्सचे काम करुन घेण्यात येते त्याला द्यावयाच्या भत्त्यासंबंधीचे आदेश अद्याप निर्गमित करण्यात आलेले नाहीत. त्यामुळे चक्रमुद्रण भत्त्याचे दर सुधारणे व झेरॉक्स भत्त्याचे प्रति दिवसाचे दर निश्चित करणे यासंबंधी शासनाचा विचार चालू होता.

३. याबाबतीत सांगोपांग विचार करुन दिनांक २१ ऑगस्ट १९६४ च्या आदेशाचे अधिक्रमण करुन शासन असे निदेशित करीत आहे की चक्रमुद्रण भत्त्याचा, तसेच झेरॉक्स भत्त्याचा प्रति दिवसाचा दर रु. १.७५ प्रमाणे असावा. या दरानुसार चक्रमुद्रण यंत्रचालक व झेरॉक्स यंत्रचालक यांच्या रजेच्या अनुपस्थितीत ते काम करणाऱ्या शिपायाला या दराने मेहेनताना मंजूर करण्यात यावा. हा खर्च कार्यालयीन खर्चातून भागविण्यात यावा.

४. प्रशासकीय विभाग/विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना वरीलप्रमाणे भत्ता मंजूर करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

५. हे आदेश दिनांक १ एप्रिल, १९९१ पासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मधुकर रा. तडवळकर,
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, सेवा-५.

---

* पत्राद्वारे.

एप-३८[१२,५०० १०-४-९१]-३